छत्रपती शिवाजी महाराज शेतकरी सन्मान योजना-२०१७ (अनुसूचित जाती उपयोजना)
नवीन लेखाशिर्ष निर्माण करणे

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: कृकमा ०६१७/प्र.क्र.१२३/२-स,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २७ जुलै, २०१७.

**वाचा:-** शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र संकीर्ण ०६१७/प्र.क्र.१२७/२-स,दि.२८.६.२०१७

**प्रस्तावना : -**

शेतक-यांना कर्ज माफी देण्यासाठी शेतकऱ्यांचे प्रतिनिधी तसेच विविध राजकीय पक्षांबरोबर कर्जमाफीच्या संदर्भात विचार विनिमय करण्यासाठी शासनाने मा. मंत्री, महसूल, मदत व पुनर्वसन व सार्वजनिक बांधकाम यांच्या अध्यक्षतेखाली दि. ९/६/२०१७ च्या शासन निर्णयाद्वारे उच्चाधिकार समिती नियुक्त केली होती. कर्जमाफीबाबत शेतकऱ्यांच्या सुकाणू समितीबरोबर व इतर संबंधितांशी विचार विनिमय करुन निर्णय घेण्यासाठी उच्चाधिकार समितीचा विस्तार करुन उच्चपदस्थ शासकीय अधिकाऱ्यांचा समावेश असलेली कर्जमाफी निकष निर्धारण समिती दि. १७.६.२०१७ रोजीच्या शासन निर्णयाद्वारे गठीत करण्यात आली.

उपरोक्त समितीचे मा. अध्यक्ष यांचेशी झालेल्या चर्चेनुसार दि. २४.६.२०१७ रोजी मा. मंत्रीमंडळ बैठकीमध्ये शेतकऱ्यांच्या कर्जमाफी योजनेस चर्चेअंती मान्यता देण्यात आली आहे व त्यानुषंगाने दि.२८.६.२०१७ रोजी कर्जमाफीबाबत शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे.

२. या योजनेचे "**छत्रपती शिवाजी महाराज शेतकरी सन्मान योजना-२०१७**" असे नामकरण करण्यात आले आहे. ही योजना राज्यस्तर, अनुसूचित जाती उपयोजना (SCP) तसेच जनजाती क्षेत्र उपयोजना (TSP) या तीन स्तरावर राबवायची आहे. यास्तव "छत्रपती शिवाजी महाराज शेतकरी सन्मान योजना (अनुसूचित जाती उपयोजना (SCP) " या योजनेवरील खर्चासाठी नवीन लेखाशिर्ष निर्माण करावयाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

"छत्रपती शिवाजी महाराज शेतकरी सन्मान योजना - २०१७ (अनुसूचित जाती उपयोजना (SCP)" या योजनेवरील खर्चाकरीता खालीलप्रमाणे नवीन मुख्यलेखाशिर्ष निर्माण करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे :-

| | |
|---|---|
| मागणी क्रमांक व्ही-०२<br>२४३५-- इतर कृषिविषयक कार्यक्रम<br>६० - इतर<br>७८९- अनुसूचित जाती उपयोजना<br>(०१) अनुसूचित जाती उपयोजनांतर्गत योजना<br>(०१)(०१) छत्रपती शिवाजी महाराज शेतकरी सन्मान योजना- २०१७ (अनुसूचित जाती | Demand No. V-०२<br>२४३५- Other Agricultural Programmes<br>६०- Others<br>७८९- Scheduled Caste Sub-Plan<br>(०१) Plan under Scheduled Caste Sub-Plan<br>(०१)(०१) Debt relief to farmers under Chhatrapati Shivaji Maharaj Shetkari |

| | |
|---|---|
| उपयोजना) अंतर्गत शेतकऱ्यांना कर्जमाफी<br><br>(२४३५ ००९१)<br>३३- अर्थसहाय्य (दत्तमत) | Sanman Yojana-२०१७(Scheduled Caste Sub-Plan)<br>(२४३५ ००९१)<br>३३- Subsidies (Voted) |

२. या योजनेवरील खर्चासाठी सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे अधिनस्त अप्पर आयुक्त व विशेष निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच लेखाधिकारी, अधिन सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय, सामाजिक न्याय विभागाच्या सहमतीने व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक २८०/अर्थसंकल्प-१३ दिनांक २०.७.२०१७ अन्वये व महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१ महाराष्ट्र, मुंबई अनौपचारिक संदर्भ क्रमांक ख.वि/चा-१/स.प.व व.वि./ युओआर ५२/२०१७-१८/४४७, दिनांक २०.७.२०१७ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०७२७१८००१३२३०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Deepak M Rane

Digitally signed by Deepak M Rane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=CMTD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2aef4bf230b6667b08affe7946621e30ca1ff655241ee17d2cbdfd697d7222f5, cn=Deepak M Rane
Date: 2017.07.27 18:08:59 +05'30'

**(दि.म. राणे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
४) अधिदान व लेखा अधिकारी, पुणे
५) निवासी व लेखा परीक्षा अधिकारी, पुणे.
६) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
७) विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (सर्व)
८) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था (सर्व)
९) वित्त विभाग (अर्थस-१३/ व्यय -२), / नियोजन विभाग / सामाजिक न्याय विभाग,मंत्रालय, मुंबई.
१०) अवर सचिव (कार्यासन १७-स) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) लेखा व कोषागारे संचालनालय, (संगणक शाखा), मुंबई
१२) निवड नस्ती (कार्यासन २-स)